**अर्थसंकल्पीय अनुदान- सन २०१०-२०११.**
**नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था)**
**पाणीपुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी**
**सहाय्यक अनुदान.**
**लेखाशीर्ष वाय-२, २२१५, (२२१५ १६४७)**
**(वेतनेतर)**

**-----------------------------------------**

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १९ मार्च, २०११.

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक २९ एप्रिल, २०१०.
२) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक १९ मे, २०१०.
३) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक २८ जून, २०१०.
४) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१०.
५) मा.मंत्री, जलसंपदा (कृ.खो.पा.मं.वगळून) यांचे पत्र मंत्री, वित्त व नियोजन/व्हीआयपी/२३५८/२०१०, दिनांक ०३ ऑगस्ट, २०१०.
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्रमांक मजीप्रा/सस/तांशा.१/७३/१३०४, दिनांक २७ ऑगस्ट, २०१०.
७) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक १८ फेब्रुवारी, २०११.
८) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक १८ फेब्रुवारी, २०११.
९) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक २५ फेब्रुवारी, २०११.
१०) शासन शुध्दीपत्रक क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक १४ मार्च, २०११.
११) शासन शुध्दीपत्रक क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४, दिनांक १४ मार्च, २०११.

**------------------------------------------------------------------------------------------**

**प्रस्तावना :-**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात विधीमंडळाने मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदींच्या अनुषंगाने नागरी पाणी पुरवठा कार्यक्रम, या योजनांतर्गत कार्यक्रमाखालील नागरी नळ पाणी पुरवठा योजनेतील, नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (२२१५ १६४७), या लेखाशीर्षाखाली रुपये ३४,५५,६६,०००/- (रुपये चौत्तीस कोटी पंच्चावन्न लाख सहासष्ट हजार फक्त) इतकी मूळ अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली होती. तसेच सन २०१० च्या विधान मंडळाच्या नागपूर येथील हिवाळी अधिवेशनात (डिसेंबर, २०१०) [१] सुजल व निर्मल अभियानासाठी रुपये ५८,३८,००,०००/- (रुपये अठ्ठावन्न कोटी अडोत्तीस लाख फक्त) आणि [२] सातारा शहराला पाणी

(कृपया मागे पहावे.)

पुरवठा करणा-या कास धरणाची उंची वाढविण्याबाबत रुपये १०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) असे रुपये ६८,३८,००,०००/- (रुपये अडुसष्ट कोटी अडोत्तीस लाख फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आली असून सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात सदर लेखाशीर्षाखाली एकूण रुपये १०२,९३,६६,०००/- (रुपये एकशे दोन कोटी त्र्यान्नव लाख सहासष्ट हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. **[मुळ अर्थसंकल्पीय तरतूद रुपये ३४,५५,६६,००० (+) अतिरिक्त पुरवणी मागणी रुपये ६८,३८,००,००० (=) एकूण रुपये १०२,९३,६६,०००/-]**

२. या मंजूर अनुदानापैकी आतापर्यंत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना **रुपये ८२,३३,८३,०००/- (रुपये ब्याऐंशी कोटी तेहेतीस लाख त्र्याऐंशी हजार फक्त)** इतके एकूण अनुदान मुक्त करण्यात आले आहे. आता माहे मार्च, २०११ या महिन्यात **रुपये १०,३०,४६,०००/- (रुपये दहा कोटी तीस लाख सेहेचाळीस हजार फक्त)** इतके अनुदान मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

राज्यातील नागरी क्षेत्रातील नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, या कार्यक्रमाखालील पाणी पुरवठा योजनांचे कार्यान्वयन महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून करण्यात येते.

२. सदर नागरी पाणी पुरवठा योजनांच्या कार्यान्वयनाकरीता सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, राज्य योजना- नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, या कार्यक्रमाखाली मंजूर असलेल्या **रुपये १०२,९३,६६,०००/- (रुपये एकशे दोन कोटी त्र्यान्नव लाख सहासष्ट हजार फक्त)** इतक्या अर्थसंकल्पीय अनुदानापैकी, या शासन निर्णयान्वये **रुपये १०,३०,४६,०००/- (रुपये दहा कोटी तीस लाख सेहेचाळीस हजार फक्त)** इतके अनुदान सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना खालील अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. या मुक्त तरतुदीचे वाटप सोबतच्या विवरणपत्रातील **स्तंभ ०५ मध्ये** दर्शविण्यात आले आहे.

३. सदर अनुदान हे फक्त सुजल व निर्मल अभियांनासाठी मंजूर असल्यामुळे सदर खर्च हा त्याच कामांसाठी करण्यात यावा, याबाबतची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी यावी.

- मुक्त अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.
- अनुदानाची रक्कम ज्याकरीता मंजूर व मुक्त करण्यात आली आहे, त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च, २०११ पर्यंत खर्च करावी.
- मुक्त अनुदानातून, होणा-या वाटपाची माहिती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वेळोवेळी शासनाला कळवावी.

- मुक्त अनुदानातून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सदर योजनांकरिता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर यांना किंवा खास अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत. याबाबत संबंधित कागदपत्रे, महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.

- मुंबई वित्तिय नियम १९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने महालेखापालांना सादर करावेत.

- महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत किंवा जी अनुदाने यापुढील कालावधीत प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने द्यावयाची आहेत. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रावर सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी प्रमाणपत्रे शासनाला स्विकारार्ह होतील.

- या मुक्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाला सादर करावे तसेच उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.

- मुक्त केलेल्या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल, विहित दिनांकास, लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२ यांच्याकडे सादर करावा.

- शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात आलेले अनुदान सदस्य सचिव किंवा वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी (श्री. शं. धे. चव्हाण), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, यांच्या स्वाक्षरीने तयार केलेल्या आणि उप सचिव (श्री. दु. र. चंद्रिकापुरे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांनी प्रतिस्वाक्षरी केलेल्या देयकानुसार धनादेशाने देण्यात येईल. सदर देयक अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, शासकीय कुटीर, नरीमन पॉईंट, मुंबई- ४०००२१ यांना सादर करण्यात यावे. सदरहु रकमेचा धनादेश महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या नांवे देण्यात यावा.

४. मुक्त केलेल्या अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, १९२ महानगरपालिका / नगरपरिषदांना सहाय्य (०२) -राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहायक अनुदान.(२२१५ १६४७) ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व त्या खालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

(कृपया मागे पहावे.)

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०३१९१५४२२०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्स्प्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.
२) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी. जी. ओ. इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०००२०.
३) महालेखापाल, महाराष्ट्र- २, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर - ४४०००१
४) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई - ४००६१४. (पाच जादा प्रतींसह )
५) प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण. (सर्व)
६) अधीक्षक अभियंता (मध्यवर्ती नियोजन, संकल्पचित्र व संनियंत्रण कक्ष), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवीन प्रशासकीय इमारत, दुसरा मजला,एस.टी.पी. कंपाऊंड, कन्हैया नगर जवळ, कोपरी कॉलनी, ठाणे (पूर्व), जि. ठाणे. पीनकोड-४००६०३
७) अधिदान व लेखा अधिकारी, शासकीय कुटीर, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.
८) निवासी लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय इमारत, सातवा मजला, वांद्रे - कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०००५१.
९) वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय- ३, बीयुडी- १८, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१०) नियोजन विभाग, कार्यासन क्रमांक १४४३ मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
११) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,०९,१३,१७,१८,२०,२२. मंत्रालय.
१२) मा.आमदार व खासदार (सर्व)
१३) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई ४०० ०३२. (१० प्रतींसह)
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. (५ प्रतींसह)
१२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, संगणक शाखा, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१३) निवड नस्ती, पापु-२४

---

शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७१०/नपापुयो/प्र.क्र.७५/पापु-२४ दिनांक १९ मार्च, २०११
सोबतचे विवरणपत्र.

**विवरणपत्र.**

**(रुपये)**

| अ. क्र. | आर्थिक लेखाशीर्ष | सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदान | आतापर्यंत मुक्त केलेले अनुदान | या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात आलेले अनुदान |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| १ | **मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, १९२ महानगरपालिका / नगरपरिषदांना सहाय्य (०२) -राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहायक अनुदान. (२२१५ १६४७). ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर),** | १०२,९३,६६,००० | ८२,३३,८३,००० | **१०,३०,४६,०००** |
| | **एकूण** | १०२,९३,६६,००० | ८२,३३,८३,००० | **१०,३०,४६,०००** |

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

---------------------------------------------------------------------------------------------------
*****************************************************************************